श्री.यु.बी.कदम,परिविक्षाधीन उपअधीक्षक,
राज्य उत्पादन शुल्क विभाग(गट-ब) यांचा
परिविक्षाधीन कालावधी वाढविण्याबाबत-

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. इएसटी २७/०८/ प्र.क्र.३७९-ब / इएक्ससी - ४,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १५ ऑक्टोबर, २००९.

वाचा: १) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०९९/प्र.क्र.२/९९/आठ दि.२१/३/२०००
२)शासन निर्णय,गृह विभाग क्र. पीईओ १००१/प्र.क्र.१५९/इएक्ससी-४ दि.८/४/२००४
३)आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांचे ज्ञापन क्र.डिपीई १००६/४१/४/प्रदक-१० दि.१७.६.२००६
४)आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. इएसटी ११०४/७२/दीन-अ-१, दि.१९.१.२००९ व २३.०३.२००९.

शासन निर्णय: श्री.यु.बी.कदम,तत्कालिन व्यसनमुक्ती व दारुबंदी प्रचार अधिकारी यांची परिविक्षाधीन उपअधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क विभाग(गट-ब) या पदावर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अतिरिक्त संवर्गातून नियुक्ती करण्यात आली.सदर शासननिर्णयातील अटी व शर्तीनुसार दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी किंवा त्यानंतर परिविक्षा कालावधी वाढवावा लागल्यास वाढविलेला परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची उपअधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क,गट'ब' संवर्गात नियमित नेमणूक केली जाईल अशी तरतूद आहे.श्री.यु.बी.कदम यांच्याविरुध्द संदर्भ क्र.३ येथील दि.१७.६.२००६ च्या आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांच्या आदेशान्वये विभागीय चौकशी सुरु करण्यात आली आहे.श्री.यु.बी.कदम,परिविक्षाधीन उपअधीक्षक,राउशु(गट-ब) यांच्याविरुध्द विभागीय चौकशी प्रलंबित असल्यामुळे संदर्भ क्र.१ येथील शासननिर्णयाच्या तरतूदीनुसार त्यांचा परिविक्षाधीन कालावधी वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. श्री.यु.बी.कदम यांच्याविरुध्द प्रलंबित विभागीय चौकशीची सद्य:स्थिती विचारात घेऊन त्यांचा परिविक्षाधीन कालावधी दि.३०.११.२००९ पर्यंत वाढविण्यास शासनमान्यता देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही १०९९/प्र.क्र.२/९९/आठ दि.२१/३/२००० अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१०१५१[illegible] असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्र. ता. गौड)

सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई

विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, कोल्हापूर

अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, सातारा

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा

श्री.यु.बी.कदम, परिविक्षाधीन उपअधीक्षक, राउशु(गट-ब) यांना आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांचेमार्फत

निवडनस्ती / इएक्ससी - ४